सन २०२५-२६ या आर्थिक वर्षामध्ये प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR Based Stream) घटकासाठी सर्वसाधारण / अनुसूचित जाती / अनुसूचित जमाती प्रवर्गाचा ₹२०२.६० कोटी निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : कृवपदुम-२५०३७/६/२०२५-MAG-१४A**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०९ मे, २०२५

**वाचा -**

१. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली झालेली ३७ व्या राज्य स्तरीय मंजुरी समितीची बैठक दिनांक २४.०३.२०२५.
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र: केंपुयो-२०२५/प्र.क्र.१४/२-अे, दिनांक ०३.०४.२०२५.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७.०४.२०२५.
४. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्र. विघयो-२०२५/ प्र.क्र.५८/ अर्थसंकल्प, दिनांक १५.०४.२०२५.
५. आदिवासी विकास विभाग, शासन परिपत्रक क्र. बीयुडी-२०२५/प्र.क्र.०२/कार्यासन-६, दिनांक २१.०४.२०२५.
६. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र: कृवपदुम-२५०३७/६/२०२५-MAG-१४A, दिनांक २२.०४.२०२५.
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक २९.०४.२०२५.
८. कृषि एवं किसान कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०२५-RKVY दिनांक ३०.०४.२०२५.

**प्रस्तावना -**

प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना ही योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येते. प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना योजनेंतर्गत मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील राज्य स्तरीय मंजुरी समितीने योजनेंतर्गत निर्माण झालेले दायित्व व सन २०२५-२६ मध्ये योजनेकडे प्रस्तावित होणारे नवीन प्रकल्प यासाठी आवश्यक निधीच्या प्रमाणात प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना - सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR based stream) या घटकाकरिता ₹५०६४७.९१ कोटी निधीच्या वार्षिक कृती आराखडयास दिनांक २४.०३.२०२५ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र.६ येथील दिनांक २२.०४.२०२५ च्या शासन निर्णयान्वये सन २०२५-२६ करीता प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना सविस्तर

प्रकल्प अहवाल (DPR Based Stream) या योजनेस ₹५०६४७.९१ कोटी इतक्या रक्कमेस प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात आली आहे.

०२. केंद्र शासनाने संदर्भ क्र.८ अन्वये, प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR Based Stream) योजनेकरिता प्रवर्गनिहाय केंद्र शासनाचा हिस्सा (६०%) ₹१२१.५६ कोटी (सर्वसाधारण प्रवर्गास ₹९७.७९ कोटी, अनुसूचित जाती प्रवर्गाचा ₹१३.२७ कोटी व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा ₹१०.५० कोटी) इतका निधी व त्याच्या समरुप राज्य हिस्सा (४०%) ₹८१.०४ कोटी (सर्वसाधारण प्रवर्गास ₹६५.१९३३३३३ कोटी, अनुसूचित जाती प्रवर्गाचा ₹८.८४६६६६७ कोटी व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा ₹७.०० कोटी) असा एकूण ₹२०२.६० कोटी इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय -

प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR Based Stream) या घटकासाठी ₹२०२.६० कोटी (रुपये दोनशे दोन कोटी साठ लक्ष फक्त) (केंद्र हिस्सा ₹१२१.५६ कोटी + राज्य हिस्सा ₹८१.०४ कोटी) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीचा तपशिल पुढीलप्रमाणे आहे.

(₹ कोटी)

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | एकुण |
|---|---|---|---|
| सर्वसाधारण | ९७.७९ | ६५.१९३३३३३ | **१६२.९८३३३३३** |
| अनुसूचित जाती प्रवर्ग | १३.२७ | ८.८४६६६६७ | **२२.११६६६६७** |
| अनुसूचित जमाती प्रवर्ग | १०.५० | ७.०० | **१७.५०** |
| **एकूण...** | **१२१.५६** | **८१.०४** | **२०२.६०** |

०२. उपरोक्तनुसार वितरित प्रवर्गनिहाय निधी केंद्र हिस्सा व राज्य हिश्याच्या पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२५-२६ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदींतून खर्च करण्यात यावा.

| **सर्वसाधारण प्रवर्ग** | |
|---|---|
| **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
| मागणी क्र. डी-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (८००) इतर खर्च<br>(००) (०९) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत अर्थसहाय्य (कें.पु.यो.) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१ ८२३५) ३३ - अर्थसहाय्य | मागणी क्र. डी-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (८००) इतर खर्च<br>(००) (११) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत अर्थसहाय्य (कें.पु.यो.) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१ A२२५) ३३ - अर्थसहाय्य |
| **अनुसूचित जाती प्रवर्ग** | |

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्र. एन-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना<br>(०१) (१५) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजनांतर्गत अर्थसहाय्य<br>(केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम)<br>(२४०१ B२२१), ३३- अर्थसहाय्य | मागणी क्र. एन-३<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना<br>(०१) (१६) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम)<br>(२४०१ B२३२), ३३- अर्थसहाय्य |
| **अनुसूचित जमाती प्रवर्ग** | |
| **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
| मागणी क्र. टी-५<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (३२) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत अर्थसहाय्य<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१ A७४४), ३३-अर्थसहाय्य | मागणी क्र. टी-५<br>२४०१ पीक संवर्धन<br>(००) (७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (३३) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१ A७५३), ३३-अर्थसहाय्य |

०३. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीचे वितरण करण्याकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR Based Stream) अंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त निधी मागणी, प्रकल्पाची तातडी, अंतिम टप्प्यावरील प्रकल्प व निधी लवकरात लवकर खर्च होणे इ. बाबी विचारात घेऊन प्रकल्पांचा प्राधान्यक्रम आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांच्या स्तरावर निश्चित करण्यात यावा. त्यानुसार, या शासन निर्णयान्वये प्रधानमंत्री राष्ट्रीय कृषि विकास योजना सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR Based Stream) अंतर्गत वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचे प्रकल्पनिहाय वितरण आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांच्या मान्यतेने करण्यात यावे.

०५. उपरोक्त मंजूर निधीचे तात्काळ उपयोजन होण्याच्या दृष्टीनेच कोषागरातून आहरण करावे आणि सर्व विभागांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या निधीचा तात्काळ विनियोग करावा, अंमलबजावणी यंत्रणांनी निधी उपयोजनाविना बँक खात्यामध्ये जमा करुन ठेवू नये.

०६. सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी/विभागांनी त्यांना सन २००७-०८ ते सन २०२४-२५ या कालावधीत वितरीत केलेल्या निधीचे सनदी लेखापालांकडून लेखापरिक्षण झाल्याचे प्रमाणित करावे.

०७. वैयक्तिक लाभाच्या प्रकल्पांतर्गत सर्व विभागांनी / अंमलबजावणी यंत्रणांनी लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (DBT) अनुदान वितरीत करावे. तसेच, संदर्भ क्र. ८ येथे नमूद केंद्र शासनाच्या दिनांक ३०.०४.२०२५ रोजीचा पत्रान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

०८. सदर शासन निर्णय वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र. शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७.०४.२०२५ आणि दिनांक २९.०४.२०२५ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५०९१५४५५१०८१९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by AMBADAS SAHEBRAO CHANDANSHIVE
Date: 2025.05.09 15:46:36 +05'30'

**(अं.सा. चंदनशिवे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन, राज्य उत्पादन शुल्क), महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेता विधानसभा/ विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
८) सर्व मा. संसद सदस्य/महाराष्ट्र विधानसभा सदस्य /महाराष्ट्र विधानपरिषद सदस्य
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
१०) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) अपर मुख्य सचिव (पशुसंवर्धन) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३) अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ, एपीजे हाऊस, मुंबई.
१७) राज्य सूचना अधिकारी, राज्य सूचना विज्ञान केंद्र, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१८) संचालक, माहिती तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
१९) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
२१) महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२२) महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
२३) वित्त विभाग (व्यय- १/अर्थसंकल्प १३), मंत्रालय, मुंबई.
२४) नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.
२५) सर्व उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२७) निवडनस्ती (१४-अे कार्यासन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.